**नक्षलग्रस्त भागाच्या विकासाचा विशेष कृती कार्यक्रम**
**सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात गोंदिया या जिल्हयाकरिता असलेल्या जिल्हा समन्वय समितीस निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नक्षल २४१५/प्र.क्र.५२ /का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९ नोव्हेंबर , २०१५ .

**वाचा :**
1. **शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : नविका १००९/प्र.क्र.६८/ का.१४१५, दिनांक १७.१२.२००९ व दिनांक २७.०१.२०१०.**
2. **वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ , दि. १७ एप्रिल, २०१५ .**
3. **शासन निर्णय नियोजन विभाग क्र.नक्षल-२४१५ / प्र. क्र. ५२ /का.१४१७, दि. १२ ऑक्टोबर, २०१५ .**

**प्रस्तावना :**
संदर्भांकित अनुक्रमांक - १ येथील शासन निर्णयान्वये गडचिरोली, गोंदिया , चंद्रपूर व भंडारा या जिल्हयातील जिल्हा समन्वय समित्यांना नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी प्रति जिल्हा रु.३.०० कोटी याप्रमाणे निधी नियोजन विभागामार्फत उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयास अनुलक्षून जिल्हाधिकारी, गोंदिया यांना सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी निधीचा पहिला हप्ता रु. २.०० कोटी उपलब्ध करुन देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**
१. गोंदिया या जिल्हयांतील विशेषत: नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे निराकरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा समन्वय समितीस संदर्भांकित अनुक्रमांक- १ येथील शासन निर्णयासोबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे सामूहिक लाभाच्या योजना/सुविधा निवडून स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीचे निराकरण करणे शक्य व्हावे यासाठी पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **सन २०१५-१६ मध्ये द्यावयाचा निधी (रुपये लाखात)** |
|---|---|---|
| १ | गोंदिया | २००.०० |
| | **एकूण** | **२००.००** |

**(एकूण रुपये दोनशे लक्ष फक्त)**

सदरहुन निधी खर्च करताना संदर्भांकित अनुक्रमांक - १ येथील शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाने शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. उपरोक्त निधी हा जिल्हाधिकारी , गोंदिया यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा. सदरहू निधी खर्च करताना त्या निधींपैकी कमीत कमी ७५% निधी नक्षलग्रस्त भागाच्या “अतिदुर्गम व अतिसंवेदनशील” या क्षेत्रामध्ये खर्च करण्यात यावा. यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कामाच्या निवडीसाठी परिच्छेद ६, ७, ८ व ९ मधील, अंदाजपत्रक व मंजूरीसाठी परिच्छेद १० मधील, निधी वितरणासाठी परिच्छेद १२ व १३ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सेक्रेटरीएट - आर्थिक सेवा, ०९०, सेक्रेटरीएट (०१) नियोजन विभाग, (०४) (०१) नक्षलवादी भागासाठी विशेष कृतीदल(योजनांतर्गत), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (३४५१ ०६५४) या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी कोषागार कार्यालयातून आहरीत व संवितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील, तसेच संबंधित जिल्हा नियोजन अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५ /प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०९१४३७३२२६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2015.11.09 14:38:53 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपुर .
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विभागीय आयुक्त,नागपूर.
७. जिल्हाधिकारी, गोंदिया .
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया .
९. जिल्हा पोलिस अधीक्षक, गोंदिया .
१०. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नागपूर.
११. उप वन संरक्षक, गोंदिया .
१२. जिल्हा नियोजन अधिकारी , गोंदिया .
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया .
१४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गोंदिया .
१५. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई- ३२.
१६. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४१४/१४२४ ), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
१७. निवडनस्ती, कार्यासन १४१७.